आपत्ती व्यवस्थापन अंतर्गत क्षमता बांधणीसाठी
(Capacity Building) निधी उपलब्ध करुन देणे

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन)**
**शासन निर्णय क्रमांक :- आव्यप्र-२०१८/प्र.क्र.११४/आव्यप्र-१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- २ जुलै २०१८.

वाचा :- १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. आव्यप्र-२०१८/प्र.क्र.११४/आव्यप्र-१, दिनांक २८.५.२०१८
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. आव्यप्र-२०११/प्र.क्र.५१ /आव्यप्र-१, दिनांक १८.५.२०११.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भ क्र. २ अन्वये आपत्ती व्यवस्थापन अधिनियम, २००५ मधील तरतूदीस अनुसरुन राज्यस्तरावर राज्य आपत्ती सौम्यिकरण निधी (State Disaster Mitigation Fund) आणि जिल्हास्तरावर जिल्हा आपत्ती सौम्यिकरण निधी (District Disaster Mitigation Fund) ची स्थापना करण्यात आली आहे.

२. संदर्भ क्र. १ अन्वये सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात राज्यातील प्रत्येक जिल्हयांस आपत्ती व्यवस्थापनासंदर्भात क्षमता बांधणीसाठी रु. ५०.०० लक्ष नियतव्यय देण्यात आला असून त्यातील ६० टक्के प्रमाणे प्रत्येकी रु. ३०.०० लक्ष तरतूद बिम्स प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आलेली आहे. राज्यस्तरावर रु. १२.०० कोटी एवढा निधी ठेवण्यात आला असून त्यातील ६० टक्के म्हणजे रु. ७.२० कोटी एवढा निधी राज्य आपत्ती सौम्यिकरण निधीत वर्ग करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आपत्ती व्यवस्थापन अधिनियम, २००५ मधील तरतूदीस अनुसरुन राज्य आपत्ती व्यवस्थापन आराखडा तयार करणे, त्यानुषंगाने विविध घटकांच्या क्षमता बांधणीसाठी तसेच उचित प्रतिबंधात्मक उपाययोजना प्रशिक्षण शोध मोहीम व बचाव कार्याशी संबंधित साहित्य खरेदी,जनजागृती आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाचे बळकटीकरण इ. बाबींसाठी रु. ७.२० कोटी (रुपये सात कोटी वीस लाख फक्त) एवढा निधी आहरित करुन राज्य आपत्ती सौम्यिकरण निधीत वर्ग करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

श्रीमती वनिता बावीसकर, लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग आणि श्री.अरुण कोल्हे, वित्तीय सल्लागार व सह सचिव, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग यांना सदर निधी आहरित करण्यासाठी अनुक्रमे आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

सदर निधीतून होणारा खर्च संदर्भ क्र.१ मधील शासन निर्णयात नमूद केलेल्या बाबीव्यतिरिक्त इतर बाबींवर खर्च करु नये. तसेच खर्च करताना वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक २ एप्रिल, २०१८ मधील तरतूदींचे पालन करण्यात यावे. लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग यानी सदर निधीबाबत स्वतंत्र लेखे ठेवावेत व सदर निधीतून ७० टक्के निधी खर्च झाल्याशिवाय व त्याबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे महालेखापालांना सादर केल्याशिवाय पुढील निधी आहरित करु नये.

सदर निधीतून शोध व बचाव कार्याशी संबंधित सर्व प्रकारच्या खरेदीकरिता २५ टक्के पर्यंत खर्च करण्यात यावा. सल्लागार /विशेषज्ञ / तज्ञ यांची नेमणूक आऊटसोर्सिंगद्वारे करतांना त्यासंदर्भात वित्त विभागाने दिनांक २.८.२०१६ रोजी निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील तरतूदींचे पालन करण्यात यावे.

या कामी होणारा खर्च मागणी क्र. सी-६, २२४५-नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ८०-सर्वसाधारण ००१ संचालन व प्रशासन (०१) महाराष्ट्र राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण (०१) (०१) महाराष्ट्र राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाचे कार्यालय स्थापन करणे व फर्निचर व साधन सामुग्रीसह सुसज्जीकरण करणे (२२४५ १७६१) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

सदरचे आदेश वित्तीय अधिकार नियमपुस्तिका-१९५८ भाग पहिला उप विभाग एक मुंबई वित्तीय नियम-१९५९ अ.क्र. २५ नियम क्र. १४९ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त असलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७०४११२१२१२७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,**

Shrirang
Shripati Gholap

Digitally signed by Shrirang Shripati Gholap
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DMU/R AND R, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e1b6e289fe7dcde27c972916398d8220a134ed8ebf6439e54d1927c5c4b28bec, cn=Shrirang Shripati Gholap
Date: 2018.07.04 11:22:11 +05'30'

**( श्रीरंग घोलप )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखाकार, महाराष्ट्र-१, मुंबई.
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३. वित्तीय सल्लागार व सह सचिव, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.
४. लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.
५. निवड नस्ती (आव्यप्र-१).